**गडचिरोली जिल्हयातील सर्व संवर्गातील रिक्त पदे सर्वोच्च प्राधान्य देऊन तातडीने भरण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२००९/प्र.क्र.२५१/०९/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ डिसेंबर, २००९

वाचा : १) शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२००७/प्र.क्र.९४/०७/१२, दि. १३.७.२००७.
२) शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२००७/प्र.क्र.१९१/०७/१२, दि. १७.११.२००७.

**शासन परिपत्रक**

शासन सेवेतील सर्व संवर्गातील रिक्त पदे तातडीने व विहित कार्यपध्दतीने भरण्याबाबतचे निदेश सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दि.१७.११.२००७ च्या शासन निर्णयान्वये दिले आहेत. तसेच विदर्भातील आदिवासी व नक्षलग्रस्त भागातील रिक्त पदे भरण्यास प्राधान्य देण्यासंदर्भात सविस्तर निदेश संदर्भाधीन दि.१३.७.२००७ च्या शासन परिपत्रकान्वये दिले आहेत. विदर्भातील रिक्त पदांची संख्या मोठया प्रमाणात असल्यामुळे विदर्भातील आदिवासी व नक्षलग्रस्त भागातील सर्व रिक्त पदे शिघ्रातीशीघ्र कोणत्याही परिस्थितीत दि.३१/७/२००७ पर्यंत भरण्याचे दि.१३.७.२००७ च्या परिपत्रकान्वये स्पष्ट केले आहे. तथापि याप्रमाणे निदेश देऊनही नक्षलग्रस्त भागातील विशेषत: गडचिरोली जिल्हयातील पदे मोठया प्रमाणावर रिक्त असल्याचे दिसून आले आहे. नक्षलग्रस्त भागातील विशेषत: गडचिरोली जिल्हयातील पदे भरण्याबाबत प्रशासकीय विभाग, विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्याकडून कार्यवाही झाली नसल्याने नक्षलग्रस्त भागाच्या विकासासाठी शासनाने लागू केलेल्या विविध योजनांची अंमलबजावणी योग्य तऱ्हेने होऊ शकत नाही. यामुळे सदर भागातील जनतेसाठी शासनाने लागू केलेल्या योजनांची अंमलबजावणी परिणामकारकरित्या करता आलेली नाही. याबाबत सर्वकष विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निदेश देत आहे :-

(१) गडचिरोली जिल्हयातील सर्व संवर्गातील रिक्त असलेली सर्व पदे विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन व सर्वोच्च प्राधान्य देऊन तातडीने कोणत्याही परिस्थितीत दि.३१.१.२०१० पर्यंत भरण्यात यावीत.

(२) गट-अ, ब (राजपत्रित व अराजपत्रित) संवर्गातील राज्यस्तरावर / महसूली विभाग स्तरावर बदलीपात्र असलेल्या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या / कर्मचाऱ्यांच्या बदल्या, बदलीच्या अधिनियमातील तरतूदी लक्षात घेऊन गडचिरोली जिल्हयात करुन त्या जिल्हयातील सर्व रिक्त पदे भरण्यात यावीत. तसेच गट -ब (अराजपत्रित), गट-क व ड संवर्गातील पदोन्नतीच्या कोटयातील पदोन्नतीसाठीच्या आदेशानुसार व कार्यपध्दतीनुसार तातडीने भरण्यात यावी. त्याचप्रमाणे सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे विहित मार्गाने व विहित कार्यपध्दती कोणत्याही परिस्थितीत दि.३१.१.२०१० पर्यंत पदे भरली जातील यादृष्टीने कार्यवाही करावी.

(३) वरील अ.क्र. २ नुसार बदलीने पदे भरताना महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन, अधिनियम, २००५ मधील यथास्थिती कलम ४ (४) (एक) अथवा (दोन) मधील तरतूदीचे पालन करुन उचित स्तरावरुन मान्यता घेऊन बदलीबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तसेच कलम ३ मध्ये विहित केलेला पदावधी पूर्ण झालेला नसेल अशा प्रकरणी कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार (कलम ६ मध्ये नमूद बदली करण्यास सक्षम लगत वरिष्ठ प्राधिका-यांची मान्यता घेण्याची) कार्यवाही करण्यात यावी.

(४) वर निदेश दिल्याप्रमाणे राजपत्रित संवर्गातील सर्व रिक्त पदे विहित कालमर्यादेत भरण्याची जबाबदारी सर्व प्रशासकीय विभागांची राहील. तसेच विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांतील सर्व रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही योग्य प्रकारे व विहित कालमर्यादेत होत आहे वा कसे याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी आढावा घेणे आवश्यक राहील.

(५) नियतकालीक बदल्यांमध्ये ज्या अधिकारी/कर्मचा-यांच्या बदल्या गडचिरोली जिल्ह्यातील कार्यालयात केल्या आहेत. परंतु ते अद्याप बदलीच्या ठिकाणी रुजू झालेले नाहीत. अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांना तात्काळ बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याच्या सूचना द्याव्यात आणि असे अधिकारी/कर्मचारी तेथे रुजू न झाल्यास तसेच आता रिक्त पदे भरताना बदली करण्यात येणारे अधिकारी/कर्मचारी तेथे तात्काळ रुजू न झाल्यास या विभागाच्या दि.६/८/२००२ च्या शासन निर्णयानुसार त्यांच्या विरुद्ध शिस्तभंगविषयक कठोर कारवाई करण्यात यावी.

२. वरील आदेशांचे पालन करुन रिक्त पदे भरण्यासंबंधीच्या कार्यवाहीचा अहवाल दि.२०/१/२०१० पर्यंत प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि. यांना सादर करण्यात यावा. त्यामध्ये पदनाम, गट (अ/ब/क/ड) रिक्त पदांची संख्या, पद कशा पध्दतीने भरले आहे त्यासंबंधीच्या आदेशाचा दिनांक, संबंधित अधिकारी / कर्मचारी रुजू झाल्याचा दिनांक याबाबतचा पदनिहाय तपशील उपलब्ध करण्यात यावा.

३. वरील आदेशानुसार गडचिरोली जिल्ह्यातील रिक्त पदे दि.३१/१/२०१० पर्यंत न भरल्यास संबंधित प्रशासकीय विभागाने / विभागाच्या सचिवांनी, तसेच क्षेत्रीय कार्यालयातील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी शासन आदेशाचे पालन केले नसल्याची बाब नाईलाजास्तव मा.मुख्यमंत्री यांच्या निदर्शनास उचित कार्यवाहीसाठी आणण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी व रिक्त पदे भरण्याबाबत तातडीने कार्यवाही करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२१८१८२२४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**के.पी.बक्षी.**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

F:\GR\200713-7-2007.lwp